**राष्ट्रीय कुटुंब लाभ योजना**
**सन २०१०-११ मधील तरतूदीचे पुनर्वाटप**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०११/प्र.क्र.३४/विसयो-१
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च,२०११

**वाचा** :- १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीयुडी-२०१०/ प्र.क्र.२८/विसयो-१, दिनांक २९ एप्रिल, २०१०.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीयुडी-२०१०/ प्र.क्र.२८/विसयो-१, दिनांक १३ ऑगस्ट, २०१०.
३) जिल्हाधिकारी, धुळे यांचे पत्र क्र.संगायो/कावि/७५/१०, दि.१८ फेब्रुवारी,२०११.
४) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.सापंशा/कार्या ३(२)/संगायो/कावि-१८/११, दिनांक १० मार्च,२०११.

**शासन निर्णय :-** राष्ट्रीय कुटुंब लाभ योजनेसाठी संदर्भ क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये सर्व जिल्हयांना अनुक्रमे रु.२.५० कोटी व रु.१२.५० कोटी असा एकुण रु.१५ कोटी निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

२. आता याद्वारे जिल्हाधिकारी, धुळे यांचेकडून संदर्भ क्र.३ येथील पत्राद्वारे, विभागीय आयुक्त, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.४ येथील पत्राद्वारे प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार तसेच शासनाकडील उपलब्ध निधीनुसार खालीलप्रमाणे तरतूदीचे पुनर्वाटप करण्यात येत आहे :-

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | जिल्हा | सन २०१०-११ मधील वितरीत तरतूद | पुनर्वाटप केलेला निधी | एकूण सुधारित तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | **धुळे** | **६७१४** | **३०००** | **९७१४** |
| २ | **नागपूर** | **६७१४** | **१४७८** | **८१९२** |
| ३ | **भंडारा** | **७७१४** | **१५००** | **९२१४** |

३. सदरहू वितरीत अनुदान मागणी क्र.एन-३ मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण ,१०४-वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना (०८)(०५) राष्ट्रीय कुटुंब लाभ योजना-दारिद्रय रेषेखालील कुटुंबाला अर्थसहाय्य (२२३५ ३००५) ५० इतर खर्च या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. जिल्हाधिकारी, धुळे, नागपूर व भंडारा यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी हा खर्च कोणत्याही परिस्थितीत त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

५. जिल्हाधिकारी, धुळे, नागपूर व भंडारा यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून केलेल्या खर्चाचा महालेखापालांच्या कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालून त्याप्रमाणे ताळमेळाचे विवरणपत्राची प्रत या विभागाच्या नियोजन कार्यासनास व या कार्यासनास पाठवावी. तसेच

उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास त्वरित पाठवावीत व त्याची प्रत या विभागाच्या नियोजन कार्यासनास व या कार्यासनास पाठवावी. कार्यांच्या ताळमेळाचे काम व्यवस्थितरित्या पार न पाडल्यास, तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास विहित वेळेत सादर न केल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकाऱ्यांवर राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक क्रमांक - २०११०३२९११२३३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ग. कि. वाघ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति
विभागीय आयुक्त, नाशिक व नागपूर.
जिल्हाधिकारी, धुळे, नागपूर व भंडारा.
संचालक ,लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे, नागपूर व भंडारा.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (विसयो-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, विसयो १